**डॉ. एस. एस. श्रीवास्तव, भा.व.से., मुख्य वनसंरक्षक (कार्य आयोजना), नागपूर यांना मानीव दिनांक मंजूर करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र : आयएफएस १०१५/ प्र.क्र. २३२/ फ-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २५ जुलै, २०१७

वाचा:-

१) शासन आदेश क्र.एएफओ १००४/ प्र.क्र.१९७/फ-७, दि.११.६.२००४
२) शासन आदेश क्र एएफओ १०१३/प्र.क्र.२०४/ फ-७, दि. ४.०९.२०१३
३) शासन आदेश क्र.आयएफएस १२१३/प्र.क्र.२०६/फ-७,दि ५.२.२०१४
४) शासन आदेश क्र आयएफएएस १०१५/प्र.क्र.१०६/फ-७, दि.२.६.२०१५
५) शासन आदेश क्र. आयएफएस २०१५/प्र.क्र.१०६/फ-७,दि.२८.७.२०१५
६) पदोन्नती छाननी समितीचे इतिवृत्त दि. १९ जून,२०१७

**आदेश :-**

भारत सरकार, पर्यावरण व वन विभाग, नवी दिल्ली यांच्या क्र १६०१९/(१)/२००८/ आयएफएस/दोन, दि. २३.२.२००९ च्या पत्रांन्वये, भारतीय वन सेवा (वेतन) नियम, दुसरी सुधारणा, २००८ अधिसूचना क्र ६९१ (ई), दि. २७.९.२००८ अन्वये भारतीय वन सेवेतील अधिकाऱ्यांची वेतन निश्चिती करण्याचे निर्देश आहेत. डॉ. श्रीवास्तव यांच्याविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई सुरु असल्यामुळे त्यांची पदोन्नती जाणीवपूर्वक रोखून ठेवली होती. आता डॉ. श्रीवास्तव यांच्याविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई पूर्ण झाली असून, त्यांच्या विरुध्द दोषारोप सिध्द झालेले नसून, त्यांना दोषमुक्त करण्यात आले आहे.

२. डॉ. एस. एस. श्रीवास्तव हे सन १९८७ च्या बॅचचे भारतीय वन सेवेतील अधिकारी असून श्री. टी. एस. के. रेड्डी, भावसे हे त्यांचे निकटतम कनिष्ठ अधिकारी आहेत. श्री. रेड्डी, भावसे यांना शासन आदेश दि. १२.३.२००४ अन्वये दि. १.१.२००४ पासून निवडश्रेणीमध्ये पदोन्नती देण्यात आली आहे. तथापि सदर बैठकीमध्ये डॉ. श्रीवास्तव, भावसे हे पात्र ठरले नसल्यामुळे त्यांना त्यापुढील निवडश्रेणी पदोन्नती करीता विचारात घेण्यात येऊन दि. २२.९.२०१४ च्या आदेशान्वये त्यांना दि.१.१.२००५ पासून निवडश्रेणीमध्ये पदोन्नती देण्यात आलेली आहे. दरम्यानच्या कालावधीत त्यांच्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु असल्यामुळे त्यांना पदोन्नती देण्यात आली नव्हती. वनसंरक्षक पदावरील पदोन्नतीच्या अनुषंगाने दि. १५.३.२००५, ९.८.२००६, २२.१.२००९, ७.९.२०११, ७.६.२०१२, २३.७.२०१३, २८.१०.२०१३ व दि. २०.५.२०१४ रोजी पदोन्नती छाननी समितीच्या बैठका आयोजित करण्यात आल्या होत्या. तथापि डॉ. श्रीवास्तव यांना निवडश्रेणी

मंजूर करण्यात आली नसल्याने उक्त बैठकींमध्ये त्यांचा विचार करण्यात आला नाही. दि. २१.५.२०१५ रोजी वनसंरक्षक पदावरील पदोन्नती करीता आयोजित करण्यात आलेल्या पदोन्नती छाननी समितीच्या बैठकीमध्ये डॉ. श्रीवास्तव यांचा विचार करण्यात येऊन त्यांना दि. २.६.२०१५ च्या आदेशान्वये वनसंरक्षक पदावरील पदोन्नती देण्यात आली आहे. सदर पदोन्नती देताना त्यांच्या वनसंरक्षक पदावरील पदोन्तीच्या मानीव दिनांकाचा विचार करण्यात आला नाही.

३. दिनांक १९.६.२०१७ रोजी आयोजित करण्यात आलेल्या पदोन्नती छाननी समितीव्दारे वनसंरक्षक पदावरील मानीव दिनांक देण्याची बाब विचारात घेताना दि. १५.३.२००५, १९.८.२००६, दि. २२.१.२००९ व दि. ७.६.२०१२ मध्ये झालेल्या पदोन्नती छाननी समितीच्या बैठकांमध्ये विचारात घेतलेल्या गोपनीय अहवालांची तपासणी केली. त्यामध्ये समितीस डॉ. श्रीवास्तव वनसंरक्षक पदाकरीता अपात्र आढळले. दिनांक २३.७.२०१३ रोजीच्या पदोन्नती समितीने विचारात घेतलेले गोपनीय अहवाल पहाता, डॉ. श्रीवास्तव हे वनसंरक्षक पदावरील पदोन्नती करीता पात्र असल्याचे समितीस आढळून आले.

४. दिनांक २३.७.२०१३ च्या पदोन्नती छाननी समितीच्या बैठकीमध्ये विचाराधीन क्षेत्रात असलेल्या अधिकाऱ्यांपैकी डॉ. श्रीवास्तव यांचे कनिष्ठ असलेले श्री. ऋषिकेश रंजन, भावसे यांना दि. २८.८.२०१३ पासून वनसंरक्षक पदावरील पदोन्नती प्रदान करण्यात आली आहे.

५. मुख्य वनसंरक्षक श्रेणीतील पदोन्नतीसाठी डॉ. श्रीवास्तव हे विचारक्षेत्रात येत असल्याने दि. ३०.६.२०११ रोजीच्या पदोन्नतीच्या छाननी समितीच्या बैठकीमध्ये त्यांच्या नावाचा विचार करण्यात येवून त्यांच्या विरुध्द सुरु असलेल्या विभागीय चौकशीच्या अनुषंगाने त्यांच्यासंदर्भात घेण्यात आलेला निर्णय सिलबंद ठेवण्यात आला होता. डॉ. श्रीवास्तव हे विभागीय चौकशीमधुन दोषमुक्त झाल्यानंतर सदरचा बंद लिफाफा दि. ११.९.२०१४ रोजी उघडण्यात आला असता, डॉ. श्रीवास्तव, भावसे हे मुख्य वनसंरक्षक श्रेणीतील पदोन्नतीसाठी अपात्र असल्याचे आढळून आले. केंद्र शासनाच्या दि.१८.११.२०१२ च्या मार्गदर्शक सूचनेनुसार डॉ. श्रीवास्तव यांचा मुख्य वनसंरक्षक पदावरील पदोन्नतीसाठी दि. २३.७.२०१३ रोजीच्या छाननी समितीच्या बैठकीमध्ये विचार करण्यात आला. सदर बैठकीमध्ये देखील पदोन्नतीबाबतचे निष्कर्ष सिलबंद ठेवण्यात आले होते. सदर लिफाफा उघडण्यात आला असता, डॉ. श्रीवास्तव हे मुख्य वनसंरक्षक पदावरील पदोन्नतीसाठी पात्र असल्याचे दिसून आले . सदर बैठकीमध्ये विचाराधीन क्षेत्रात असलेल्या अधिकाऱ्यांपैकी डॉ. श्रीवास्तव यांना कनिष्ठ असलेले श्री. संजीव गौड, भावसे यांना शासन आदेश दि. ५.२.२०१४ अन्वये मुख्य वनसंरक्षक पदावर पदोन्नती देण्यात आलेली आहे.

६. उपरोक्त परिच्छेद ३, ४ व ५ येथिल बाबी विचारात घेता, डॉ. एस.एस.श्रीवास्तव, भावसे यांना कनिष्ठ अधिकाऱ्यांचा पदोन्नतीचा दिनांक मानीव दिनांक म्हणून पूर्वलक्षी प्रभावाने खालील प्रमाणे मंजूर करण्यात येत आहे. डॉ. श्रीवास्तव, भावसे यांना मानीव दिनांकापासून वेतन व भत्ते अनुज्ञेय राहतील.

| अ.क्र. | पदोन्नतीचे पद | वेतनश्रेणी | निकटतम अधिकाऱ्याचे नाव/ पदोन्नतीचा दिनांक | पदोन्नतीच्या पदाचा मंजूर करण्यात येत असलेला मानीव दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | वनसंरक्षक | ३७४००-६७०००, ग्रेड पे ८,९०० (सहाव्या वेतन आयोगानुसार) | श्री ऋषिकेश रंजन दि. २८.०८.२०१३ | दि. २८ ऑगस्ट,२०१३ |
| २ | मुख्य वनसंरक्षक | ३७४००-६७०००, ग्रेड पे १०,००० (सहाव्या वेतन आयोगानुसार) | श्री संजीव गौड दि. ५.२.२०१४ | दि. ५ फेब्रुवारी,२०१४ |

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७२६११४०२६१६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2017.07.26 11:48:12 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रति,**

डॉ. एस. एस. श्रीवास्तव, भावसे, मुख्य वनसंरक्षक (कार्य आयोजना) नागपूर

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५. अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक),नागपूर
६. महालेखापाल , १ / २- (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
७. सहायक संचालक, भावसे लेखा विभाग, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती/ वैयक्तिक नस्ती.